# ‘लताजी - ८१’

श्रीमती लता मंगेशकरांचा सहस्त्र चंद्रदर्शन सोहोळा अलिकडेच थाटात साजरा झाला. हया महिन्यात त्या ८१ व्या वर्षात प्रवेश करत आहेत. त्यांच्या पंचाहत्तरीच्या वेळी ‘आज तक’ वाहिनी वरून एक मुलाखत प्रसारित झाली होती. ती अलिकडेच पुन्हा एकदा पहायला मिळाली. त्यात त्या खूप मोकळेपणी व अगदी मनापासून बोलल्या आहेत. “साधारणपणे १९९0 नंतर मी पार्श्वगायन बंद केलं. जेव्हा काम खूप होतं तेव्हा रात्रंदिवस काम केलंय. आता फारशी कुठं जात नाही. उद्या मी नसेन. पण माझा ध्वनिमुद्रित आवाज मात्र मागे राहील. पुढच्या पिढयांना तो आवडेल की नाही कुणास ठाऊक”.

ही मुलाखत ऐकत असताना माझ्या मनात विचार आला की लताजींना अशी शंका का बरे यावी ? ‘कालाय तस्मै नमः’ हे खरंच आहे. अजून पन्नास शंभर वर्षांनंतर कदाचित ही कुठलीच गाणी त्या पिढीतल्या माणसांना आवडणार नाहीत. पण आजच लताजींना हा प्रश्ण का बरं पडावा?. वयाच्या ऐंशी पैकी किमान चाळीसहून अधिक वर्षे त्या पार्श्वगायनाच्या क्षेत्रात आहेत. सर्व भाषांतली मिळून सहा साडेसहा हजार गाणी त्यांनी गायिलेली असून त्यांची सूची पण विविध पुस्तकांतून प्रकाशित झालेली आहे. यातल्या बहुतेक गाण्यांच्या ध्वनिमुद्रिका निघाल्या. त्या संग्राहकांनी व रेडियो सिलोन सारख्या मातब्बर संस्थांनी जपून ठेवल्या व वर्षानुवर्षे रसिकांना ऐकवल्या. इंदूरच्या ध्वनिमुद्रिका संग्राहक सुमन चौरासिया यांनी तर त्यांच्या नावाचं संग्रहालयच आपल्या गावात ऊभारलंय. हरमंदिर सिंग हमराजचे ‘हिंदी फिल्म गीत कोषा’चे खंड, विश्वास नेरूरकरांचा ‘गंधार स्वर यात्रा’ हा गीतकोष, स्नेहाशिष चॅटर्जींचा बंगाली गीत कोष पूर्वीच सिद्ध झाले असून संदर्भग्रंथ म्हणून मान्यता पावलेले आहेत. ‘गाणी गळयातली, मनातली’चे अकरा खंड, ‘गोड गोड भावगीते’, ‘अनमोल गाणी’ हया गाण्यांच्या पुस्तकातून त्यांनी गायिलेल्या व गाजलेल्या मराठी गाण्यांचे शब्द उपलब्ध आहेत. पूर्वी चार आणे किंमतीच्या चार घडयांच्या पुस्तिकांतून त्यांची असंख्य हिंदी फिल्मी गाणी छापील स्वरूपात उपलब्ध होत असत. ही सगळी सामग्री अभ्यासकांना, संशोधकांना व रसिकांना फार मोलाची

वाटते. त्यातूनच पुढील अभ्यास व संशोधनाचे नवनवीन विषय सुचत जाणार आहेत. उदा. त्यांच्या गळयात 'गंधार' आहे म्हणजे नेमकं काय आहे? . त्यांच्यावरचे चरित्र व गौरव ग्रंथ व 'गाऊ त्यांना आरती' छाप लिखाण तर मुबलकच आहे. अगदी सर्व भारतीय व परदेशी भाषांमध्ये आहे. त्यांच्या नावाचा जरी कुठे उल्लेख आला तरी ते कात्रण चिकाटीनं मिळवून संग्रह करणारा अवलिया भक्त पुण्यातच आहे. लिखित व ध्वनिमुद्रित सामग्री अफाट आहे.

लताजींचं नाव जरी घेतलं तरी 'हवामें उडता जाये, मेरा लाल दुपटटा मलमलका' पासून ते 'दीदी तेरा देवर दिवाना' पर्यंत शेकडो गाणी आपोआप एका पाठोपाठ मनात वाजायला लागतात. संगणक, मोबाईल फोनमुळं हवी तेव्हा ही गाणी ऐकता व पाहता येतात. आता तर पदरमोड करून डिजिटल रूपातली गाणी फुकटात ऐकण्यासाठी इंटरनेटवर भरून ठेवायचा सपाटाच तरूणांनी लावलाय. सायबर विश्वात त्यांच्या नावावर लक्षावधी संकेतस्थळं आहेत. 'यू टयूब' सारख्या सर्वदूर पोहोचलेल्या माध्यमातून त्यांची गाजलेली व फारशी ठाऊक नसलेली गाणी सुद्धा त्यांच्या भक्तजनांनी प्रयत्नपूर्वक मिळवून भरून ठेवलेली आहेत. अगदी बारा पंधरा वर्षांच्या असताना 'मालकंस' रागातली एका मिनिटाची व्हिडियो क्लिप पण एकानं भरून ठेवलेली आहे. हे काम सगळी गाणी मिळेतोवर जगभर विखुरलेले त्यांच्या गाण्यांचे प्रेमी सतत करत राहणारच आहेत. त्यामुळेच अजून वीस पंचवीस वर्षे तरी त्यांचा आवाज ऐकला जाणार व रसिकांना आवडणार यात काहीच शंका नाही. त्यामुळं शंभरीकडं वाटचाल करत असतांना लताजींनी हा विचारही मनात आणू नये. अगदी त्यांच्याच एका गाण्याचे शब्द घेऊन सांगायचं ठरवलं तर असं म्हणता येईल - 'हम तुम्हें यूँ भुला न पाऐंगे, जब कभी भी सुनेंगे गीत आपके'.

डॉ. सुरेश चांदवणकर
फोनः ०२२-२२८०४९८६
मोबाइल : ९९२०८१३३३६
e-mail: chandvankar.suresh@gmail.com
==========================================